पंचायत समिती दक्षिण सोलापूर, (जि. सोलापूर) येथील प्रशासकीय इमारत बांधकामास सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः** पंसई-२०१८/प्र.क्र.१/बांध-४

५ वा मजला, २५ मर्झबान पथ, बांधकाम भवन

फोर्ट, मंत्रालय, मुंबई. ४०० ००१

**तारीख**: २१ फेब्रुवारी, २०२२

<u>वाचा -</u>

१) **ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः** पंसई-२०१३/प्र.क्र.६४/पंरा-७, दिनांक ३ ऑगस्ट, २०१३.

२) **अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांचे पत्र क्रमांक :** क्र/जिपसो/बांखा-१/प्रकल्प-४/१६/२०१८, दिनांक ०२ जानेवारी, २०१८.

३) **अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांचे पत्र क्रमांक :** क्र/जिपसो/बांखा-१/प्रकल्प-४/७८७/२०१९, दिनांक ०५ सप्टेंबर, २०१९.

४) **अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांचे पत्र क्रमांक :** क्र/जिपसो/बांखा-१/प्रकल्प-४/३९५/२०२०, दिनांक १६ सप्टेंबर, २०२०.

<u>प्रस्तावना -</u>

अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांनी वाचा मधील अनुक्रमांक २, ३ व ४ येथील पत्रान्वये, पंचायत समिती, दक्षिण सोलापूर (जि. सोलापूर) नवीन प्रशासकीय इमारतीच्या बांधकामास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

०२. ग्राम विकास विभागाच्या दिनांक ३ ऑगस्ट, २०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये, पंचायत समिती, दक्षिण सोलापूर, (जि. सोलापूर) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रू.२०१.१७ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांनी पंचायत समिती, दक्षिण सोलापूर, (जि. सोलापूर) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास सन २०१३ मध्ये प्रशासकीय मान्यता मिळालेली असून सन २०१५-१६ मध्ये तांत्रिक मान्यता झाल्याने तसेच दरम्यानच्या कालावधीत जागेची अडचण झाल्याने कालावधी वाढ झाल्याचे तसेच मा. वास्तुविशारद यांच्या सूचनेनुसार, तिसऱ्या मजल्यावरील हॉलची उंची वाढवल्याने मुळ रकमेत वाढ झाल्याचे नमुद केलेले आहे. यास्तव, पंचायत समिती, दक्षिण सोलापूर, (जि. सोलापूर) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रू.२२९.९३ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय

मान्यता देण्याबाबत विनंती केलेली आहे. सदरचे अंदाजपत्रक अधिक्षक अभियंता, सा.बां. मंडळ, सोलापूर व कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, सोलापूर यांनी साक्षांकित केलेले आहे.

**०३.** अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या छाननी अंती, पंचायत समिती, दक्षिण सोलापूर, (जि. सोलापूर) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रू.२२९.९३ लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

पंचायत समिती, दक्षिण सोलापूर (जि.सोलापूर) नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या मुळ प्रशासकीय मान्यता रूपये २०१.१७ लक्ष रकमेमध्ये रू.२८.७६ लक्ष इतकी वाढ करून रू.२२९.९३ लक्ष (रुपये दोन कोटी एकोणतीस लक्ष त्र्याण्णव हजार फक्त) इतक्या रकमेच्या सुधारित अंदाजपत्रकास, या शासन निर्णयान्वये सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. पंचायत समिती, दक्षिण सोलापूर (जि.सोलापूर) नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या मुळ प्रशासकीय व सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या अंदाजपत्रकाचा तुलनात्मक गोषवारा पुढीलप्रमाणे आहे.

| General Abstract For Construction of South Solapur P. S. Administrative Building Revise A.A. | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **Sr. No.** | **Description of Item** | **As per A.A. (In Rs.)** | **As per Revise (In Rs.)** | **Saving (In Rs.)** | **Excess (In Rs.)** |
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 |
| 1 | Total Civil Portion | 14683693.00 | 20321047.00 | - | 5637354.00 |
| 2 | Add 1 % for Computerisation | 146837.00 | 0.00 | 146837.00 | - |
| 3 | Add 11 % for Electrification | 1615206.00 | 1400000.00 | 215206.00 | - |
| 4 | Add 8 % for Water Supply & Sanitation | 1174695.00 | 0.00 | 1174695.00 | - |
| 5 | Add 5 % for Lift Provision | 734185.00 | 0.00 | 734185.00 | - |
| 6 | Add 4 % for Contingency | 587347.00 | 0.00 | 587347.00 | - |
| 7 | Add 6 % for Price Variation | 881022.00 | 0.00 | 881022.00 | - |
| 8 | Add for Rain Water Harvesting and Fire Fighting | 293674.00 | 0.00 | 293674.00 | - |
| 9 | Add for GST | 0.00 | 1271686.00 | - | 1271686.00 |
| Total | | 20116659.00 | 22992733.00 | 4032966.00 | 6909040.00 |
| Additional (Column 6- Column 5) | | | | | 2876074.00 (14.30 % वाढ) |
| **Says** | | **2,01,17,000/-** | **2,29,93,000/-** | | **28,76,000/-** |

०३. उपरोक्त बांधकामासाठी संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरूपात, टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करून दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यात येईल. पंचायत समिती, दक्षिण सोलापूर (जि.सोलापूर) नवीन प्रशासकीय इमारत बांधकामासाठी रू.४४.७७ लक्ष इतका निधी पंचायत समिती, दक्षिण सोलापूरला देय राहील. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती

बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

०४. प्रस्तुत कामात पुन:श्च कोणतीही भाववाढ यापुढे देय होणार नाही. सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत लेखे अंतिम करण्यात यावेत.

०५. प्रस्तुतचा शासन निर्णय हा वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच, अनुक्रमांक ९, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ स्तंभ - ५ खाली, प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२२११५२३२९६७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN
DEVICHAND
JAIN

Digitally signed by PRAVIN DEVICHAND JAIN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e86ac5658c4f446f46a56052bf048257ffe4ea09078de9d556ae5babe8adc8b1, pseudonym=37D9D56800E3803E7F4DEAA21F9F7FAB712736F6, serialNumber=481AF6EECE7C1D432D3119135BE703BF6529E7A455A9B17708C677B565D8EE24, cn=PRAVIN DEVICHAND JAIN
Date: 2022.02.21 16:15:29 +05'30'

**(प्रविण जैन)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
२) अ.मु.स. (ग्रा.वि. व पं.रा.), मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
४) सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई /महाराष्ट्र -२, नागपूर.
६) विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे विभाग, पुणे.
७) मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर.
१०) अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर.
११) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर.
१२) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, सोलापूर.
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा सोलापूर.

१४) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१५) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, पुणे विभाग, पुणे.
१६) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, सोलापूर.
१७) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, दक्षिण सोलापूर, जि. सोलापूर.
१८) सभापती, पंचायत समिती, दक्षिण सोलापूर, जि. सोलापूर.
१९) वित्त विभाग (व्यय-१५/अर्थ-१६), मंत्रालय, मुंबई.
२०) नियोजन विभाग (का.१४४४), मंत्रालय, मुंबई.
२१) सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई.
२२) कार्यासन वित्त-१ व योजना-७, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३) निवडनस्ती, कार्यासन बांधकाम-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.